**संत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठाची चौकशी करण्यासाठी नेमण्यात आलेल्या समिती अध्यक्षांचे मानधन निश्चित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२५/ई- ११०७००१/विशि-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय मुंबई-४०००३२
दिनांक :-१९ मे, २०२५.

<u>वाचा</u>:-उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. बैठक- २४०८/ई-८३६९०१/विशि-१, दि. १२ फेब्रुवारी, २०२५.

<u>प्रस्तावना</u>:-

संत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठाशी संबंधित विविध मुद्यांबाबत चौकशी करुन अहवाल सादर करण्यासाठी दि.१२ फेब्रुवारी, २०२५ च्या शासन निर्णयान्वये समिती गठीत करण्यात आली होती. सदर समितीचे अध्यक्ष मा. न्यायाधीश श्री. मारोतीराव गायकवाड (निवृत्त) यांचे मानधन निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यासंदर्भात खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय**:-

०१. अ) संत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठाशी संबंधित विविध मुद्यांबाबत चौकशी करण्यासाठी नेमण्यात आलेल्या समितीचे अध्यक्ष उच्च न्यायालयातील सेवानिवृत्त न्यायाधीश आहेत. सदर बाब विचारात घेता त्यांना समितीच्या कामाकरिता सध्या कार्यरत असणाऱ्या उच्च न्यायालयाच्या न्यायमूर्ती यांना अनुज्ञेय असणाऱ्या वेतनाइतके म्हणजेच प्रतिमाह रु. २,२५,०००/- (दोन लाख पंचवीस हजार फक्त) इतके मानधन अनुज्ञेय करण्यात येत आहे.

ब) इतर सोयीसुविधा म्हणजेच मदतनिसाचे वेतन, टेलिफोन भत्ता, पाहुणचार भत्ता यासाठी प्रतिमाह रु. २७,०००/-( सत्तावीस हजार फक्त) इतका ठोक भत्ता अनुज्ञेय करण्यात येत आहे.

क) चौकशीच्या अनुषंगाने समिती अध्यक्षांना विमान प्रवास अनुज्ञेय करण्यात येत आहे.

०२. समितीचे इतर सदस्य हे शासकीय कर्मचारी असल्याने त्यांना शासनाच्या प्रचलित असलेल्या नियमानुसार दैनिक भत्ता, प्रवास भता व इतर अनुषंगिक भत्ते अनुज्ञेय राहतील.

०३. वरील बाबीकरिता होणारा खर्च "डब्ल्यू-६, २२५१-सचिवालय-सामाजिक सेवा", ०९०-सचिवालय (०१) (०१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, (२२५१ ०४०९), २८ व्यावसायिक सेवा" या लेखाशिर्षाखालील, सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२५०५१९१८२५४७२६०८ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANDESH RAJARAM UTEKAR

Digitally signed by SANDESH RAJARAM UTEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=009789e9fe23fde06096381e43bebecd32b5c692c899745eee7d89d805005a87, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A98DB55C25ABAA2B7FE0A5F9D090F310D08C3FA1A1AF8D527E486E2673087F8C, cn=SANDESH RAJARAM UTEKAR
Date: 2025.05.19 18:26:27 +05'30'

**( सं. रा. उतेकर )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. श्री. मारोतीराव गायकवाड,निवृत्त न्यायाधिश,उच्च न्यायालय,मुंबई.
३. अपर मुख्य सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवड नस्ती (विशि-१)